# शशिकला

शशाङ्क





किम्मत ६ आणे

मकरसङ्क्रमण, शके १८५६.

साहित्य-सरोज-मण्डळ, औन्ध

अनन्त यशवन्त देशपाण्डे
श्रीधर गणेश दाढे
दत्त गोविन्द बोपर्डीकर
बालकृष्ण मार्तण्ड दाभाडे

प्रकाशक
बालकृष्ण मार्तण्ड दाभाडे
औन्ध [ जि. सातारा ]

मुद्रक
लक्ष्मण नारायण चापेकर
' आर्यसंस्कृति मुद्रणालय '
टिळकरस्ता, पुणें नं. २.

## प्रस्तावना –



मराठी वाङ्मयप्राङ्गणांत कवि शशाङ्कांची ही मानसकन्यका 'शशिकला' आज प्रथमच पदक्षेप करीत आहे. 'शशिकले'च्या आगमनानें मराठी साहित्यप्रान्तांत कांही अननुभूत अपूर्व अशी प्रचण्ड खळबळ उडणार आहे. तस्मात् साहित्यिकांनो, वाचकांनो, वृत्तपत्रकारांनो आणि धन्देवाईक टीकाकारांनो, होशियार !–अशी इषाऱ्याची टिमकी अगोदरच ग्रन्थारम्भीं वाजवावी, असल्या प्रस्तावकांच्या पारम्परिक अभिनिवेशानें मी ही प्रस्तावना लिहिण्यास उद्युक्त झालेलों नाहीं. मराठी वाङ्मयाच्या उपवनांत एखाद्या ओळखीच्या माळ्यानें वा अनामिक माळणीनें एक नवीन पुष्पवाटिका निर्माण केली आहे, तर ती पाहण्यास अगोदर चला – असा आपल्या स्तुतिपाठक स्नेह्यांकडून अगदीं तिऱ्हाइतपणानें अगोदरच डाङ्गोरा पिटायला मिळावा म्हणून या नाटकाच्या लेखकांनीं माझी नियोजना निसन्देह केलेली नाहीं. कवि शशाङ्कांनां मी आजवर जन्मांत कधीं पाहिलेलेंसुद्धां नाहीं तर मग परिचय वा स्नेह तरी कुठला ! बरें, आज बरेच वर्षांचा उभयतांमध्यें पत्रव्यवहार आहे म्हणावा, तर तसेंहि कांहीं नाहीं. कारण

‘ शशिकलेचें हस्तलिखित त्यांनीं माझ्याकडेस वाचून पाहण्यासाठीं म्हणून पाठविलें तेव्हांच त्यांनी मला पहिलें पत्र लिहिलें आणि त्याच पत्रांत त्यांनीं मला विनन्ति केली होती – ‘ जर आपणास ‘शशिकला’ थोडीफार आवडली तरच आपण प्रस्तावना लिहा. न आवडल्यास बेलाशक परत करा. भीड राखूं नका. ’ – आणि थोडीफार नव्हे तर ‘ शशिकला ’ मला बरीचशी आवडली. अर्थातच प्रस्तावना लिहिणें क्रमप्राप्त आलेंच. मराठी साहित्याच्या उद्यानांत, अगदीं एकीकडच्या दुर्लक्षित अशा कोपऱ्यांत, हें एक चिमुकलें, साधेंसुधें पण सुन्दर फूल उमललें आहे — एवढेंच मला रसिकांना दिग्दर्शित करायचें आहे.

‘ शशिकले’चें हें फूल मूलतः महाराष्ट्रभूमींत रुजणारें, अस्सल महाराष्ट्रीय असें नाहीं. बङ्गालच्या कसदार, सुपीक भूमींत प्रथम फुललेलें हें मनोहर भावपुष्प कवि शशाङ्कांनीं महाराष्ट्राच्या मावळखोऱ्यांत आणून लावलें आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, ‘ शशिकला ’ भाषान्तरित वा रुपान्तरित आहे. मला साङ्गायचें आहे त्याचा आशय एवढाच कीं, शशाङ्कांच्या ‘ शशिकले’च्या फुलांतल्या रङ्गछटा रवीन्द्रांच्या भावपुष्पांशीं जुळणाऱ्या अशा आहेत. रवीन्द्रांच्या अनेक अतिमनोहर नाट्यसुमनांची आणि या रङ्गाच्या फुलाची जात एकच आहे. शशाङ्काच्या कौमुदीची शीतल सुषमा कितीही आल्हाददायक असली, तरी शशाङ्क स्वयम्प्रकाशी नाहीं, रवीन्द्रापासून परावर्तित झालेल्या प्रकाशकिरणांवर शशाङ्काचें शान्त तेज अधिष्ठित असतें, आणि म्हणून रवीच्या उसन्या तेजावर शशाङ्क प्रकाशतो – हे आणि असल्या तऱ्हेचे विचार अभ्यासजड रुक्ष शास्त्रज्ञानांच सुचणार. ( आणि मलाही ते सुचले आहेत – यांत शङ्का नाहीं. ) पण त्यामुळें शशाङ्काच्या शोभेंत थोडेंच कांहीं उणें होणार आहे !

'शशिकले' सारखीं चिमुकलीं, भावनाधिष्ठित, प्रसङ्गप्रधान नाटकें लिहिण्याचा उपक्रम प्रथम रवीन्द्रनाथ ठाकूर यांनींच केला. पण पाश्चात्य वाङ्मयांत आणि रङ्गभूमीवर आज लोकप्रिय, रूढ झालेल्या एकाङ्की नाटकांची प्रथा आणि रवीन्द्रांचीं हीं चिमुकलीं नाटकें यांत मूलतःच विलक्षण फरक आहे. किम्बहुना नाट्यविशेष या पलीकडे या दोन नाट्यप्रकारांत कांहींच साम्य नाहीं.

रवीन्द्रांच्या या नाट्यकृतींचा, किम्बहुना त्यांच्या सर्वच ललितवाङ्मयाचा पहिला वैभवशाली विशेष म्हणजे, आत्यन्तिक काव्यात्मकता. रवीन्द्रांची कोणतीही ललितकृती अभ्यासिली असतांनां त्यांतल्या शब्दाशब्दामधून प्रतीत होणारी ही काव्यात्मकता त्यांच्या वाङ्मयांत अधिकच प्रकर्षानें उमटून दिसते. त्यांच्या नाटकांतली सूचक पार्श्वभूमी, त्या स्वप्नमय पार्श्वभूमीवर वावरणारे स्त्रीपुरुष, त्या स्त्रीपुरुषांनां एकाच सूत्रांत गुम्फणारी प्रसङ्गप्रणाली, त्या विशिष्ट प्रसंगीं आविष्कृत झालेले त्या स्त्रीपुरुषांचे भव्य वा मृदू स्वभावविशेष, ते स्वभावविशेष हलुवारपणानें व्यक्त करणारी रवीन्द्रांची बव्हर्थसूचक, रसानुकूल अशी काव्यमय भाषाशैली आणि त्या भाषासौन्दर्यातून अभिप्रेत होणारा रमणीय अलङ्कारांचा मनोज्ञ कल्पनाविलास — रवीन्द्रांच्या नाटकांतल्या या प्रत्येक वैशिष्ट्यांत काव्यात्मकता ओथम्बून भरलेली असते. ठाकूरांच्या नाट्यकृतींच्या यशस्वितेचें हें रहस्य शशाङ्कांनीं पूर्णतया आकलन केलेलें दिसतें. कारण त्यांच्या 'शशिकलेंत' ठायींठायीं ही काव्यात्मकता आपाततःच प्रतीत झाल्याशिवाय रहात नाहीं.

'शशिकलें'त सूचकतेनें अभिव्यक्त केलेली पार्श्वभूमी, प्रत्यक्ष दिग्दर्शित न करण्यांत शशाङ्कांनीं आपली संयमशीलताच व्यक्त केली आहे. रवीन्द्रांच्या नाट्यकृती काय, ललितकथा काय, किम्वा प्रणयकविता काय, त्या

इतक्या हृदयस्पर्शी होतात याचें पहिलें प्रभावी कारण म्हणजे त्यांची संयमशील सूचकताच आहे. प्रत्यक्ष साङ्गण्यापेक्षां सूचकतेनें दिग्दर्शित करण्यांत आणि निरर्थ अशा शेंकडों शब्दांपेक्षां एकच सूचक शब्द निवडण्यांत, खरी कला आहे हें शशाङ्क जाणतात. विशेषतः नाटकाच्या पर्यवसानीं त्यांनीं जो यथोचित संयम दाखविला आहे तो खरोखरच प्रशंसनीय आहे. ज्याच्यावर आपण आजवर प्राणापलीकडे प्रेम केलें त्या आपल्या वल्लभाचा आपल्या पित्याकडून प्राणघात झाला, ही दुक्खद वार्ता कळल्यानन्तरही काव्यात्म अंतःकरणाची भावविवश शशिकला अन्तस्संयमित भावनांचा आविष्कार एका शब्दानेंही करीत नाहीं. वास्तविक भावनांचे बन्धारे फोडून, शोकरसाचे पाट वाहवण्याची ही किती नामी सन्धी होती ! ‘ राजसंन्यास ’ लिहिणाऱ्या गडकऱ्यांच्या अन्धभक्तांच्या लेखणीनें हा प्रसङ्ग कसा शृङ्गारला असता, याची नुसती कल्पना केली तरी मी काय म्हणतों याची कल्पना येईल. अतिरञ्जित भावनाचित्रणाच्या नादीं शशाङ्क लागलेले नाहींत ही समाधानाची गोष्ट आहे. योग्य संयमांतच अपरम्पार सामर्थ्य असतें — हें तत्त्व त्यांना पुरेपूर पटलेलें आहे. कारण त्यांच्या पार्श्वभूमींत, स्वभावचित्रणांत, वर्णनांत, प्रसङ्गनिवडींत आणि सम्भाषणांत काव्यात्मकता आहे, पण त्याबरोबरच संयम पण आहे. अगदीं आवश्यक तेवढींच पात्रें मोठ्या कसोशीनें निवडून, त्यांच्या सम्भाषणांतून त्यांचें स्वभावलेखन करण्यांत शशाङ्कांनीं आपली संयमशील कला प्रगट केली आहे. आवश्यक तेवढ्यांचेच फक्त शब्दोच्चारण करून, त्यांतून सभोंवारची पार्श्वभूमी चित्रित करावी आणि विविध घटना सूचित व्हाव्यात ही कलात्मकता त्यांच्यामध्यें आहे.

‘ शशिकला ’ ही चिमुकली नाट्यकृती पृष्ठसंख्येनें लहान असली तरी तिच्यांत भाषाशैलीची, स्वभावाविष्करणाची, भावदर्शनाची आणि नाट्य-

प्रसङ्गांची सौन्दर्यस्थलें अमूप आहेत. शशाङ्कांची भाषासरणी सामान्यतः काव्यमय, अलङ्कारिक, शब्दसुन्दर, अर्थवाही आणि सूचक आहे. उपमा हा त्यांचा आवडता अलङ्कार दिसतो. – ‘ व्याधगीतानें लुब्ध झालेल्या कुरङ्गाप्रमाणें’ – आणि ‘ जिथें ज्योत तिथें छाया त्याप्रमाणें ’ – या उपमा, किम्वा – ‘ अगोटीच्या सुमारास मृत्तिकेचा मत्तगन्ध सभोंवार दरवळतो आणि जीव किञ्चित्काल धुन्द होतो ’ – ही सुन्दर उपमा, किम्वा, – ‘ प्रेम हें स्त्रीचें सर्वस्व असतें, ’ – या अबाधित सिद्धान्ताच्या समर्थनासाठीं दिलेली – ‘ वृक्षाला घट्ट आलिङ्गन देऊन त्याच्या चरणावर फुलें वहावींत हें वेलीचें काम, तर वेलीला सांवरून सर्व जगाला फळें आणि छाया देणें हें वृक्षाचें काम. वेलीचा नाश झाला तर तिच्याकरितां चार अश्रू टाकून आपलें कार्य वृक्षाला आमरण करावें लागतें. पण वृक्षाचा आधार गेला तर वेलीला प्राणत्यागाखेरीज गत्यन्तरच नसते.’ – ही अतिसुन्दर दीर्घोपमा, ( आणि अशी सौन्दर्यस्थळें आणखीन कितितरी सांपडतील )–या सर्व उपमा रवीन्द्रांचा अनुकार करणाऱ्या साहित्यशिष्याला अभिमानास्पद वाटतील आणि भूषणभूत होतील अशाच निस्संशय आहेत.

‘ शशिकले ’च्या पहिल्या तीन अङ्कांत प्रणयविद्ध अंतःकरणांचीं आन्दोलनें हळुवारपणानें चित्रित केलेलीं आहेत. चवथा अङ्क सर्वच दृष्टींनीं कलात्म आहे. अन्तीं येणाऱ्या करुण पर्यवसानाची अगोदरपासूनच सर्व अङ्कावर अन्धारलेली उदास छाया, त्या घनदाट छायेच्या काळोखांत विश्वस्तपणें वावरणारी प्रणयिनी राजकन्या, तिच्या सङ्गमोत्सुक हृदयाची अधीर उत्कण्ठा, मन्दाकिनीचें आणि तिचें मधुर सम्भाषण, नन्तर एकदम सारङ्गनयनेनें अभावितपणें आणलेली शशिकलेच्या वल्लभाच्या प्राणनाशाची भयानक वार्ता, आणि ती बातमी शान्तपणानें ऐकून घेऊन आपल्या प्रियकरा-

वरील उज्वल प्रेमासाठीं शशिकलेनें केलेला आत्मघात,—हें सर्वच ज्या संयमशील कल्पकतेनें चित्रित केलें आहे. ती कल्पकता निस्सन्देह, अभिजात कलावन्ताचीच असली पाहिजे, यांत शङ्का नाहीं. प्रथमाङ्कांतील अल्लड, खेळकर, बालिश पण काव्यात्म अशी मुग्धा, नन्तर आपल्या सखीपाशीं आपल्या हृदयांतील गूढ भावनांचा आविष्कार करणारी प्रणयविद्धा, आणि पर्यवसानीं आपल्या मृत प्रियकरामागोमाग शान्तपणें मरणाला मिठी मारणारी त्यागशील मृत्युदग्धा – राजकन्या शशिकलेच्या स्वभावांतलीं हीं सर्व स्थित्यन्तरें शशाङ्कांनीं नाजुक हळुवारपणानें चित्रित केलेलीं आहेत. प्रेम हें स्त्रीचें सर्वस्व आहे— या सत्युक्तीचें शशिकला मूर्तिमन्त आविष्करण आहे.

'अर्थातच कोणतीही कृती पूर्ण निर्दोष असूं शकत नाहीं',– या न्यायानें याही कृतींत दोष आहेत, नाहींत असें नाहीं. पण दोष आहेत ते किरकोळ आहेत ( पण उपेक्षणीय नाहींत ). वस्तुतः त्या दोषांची दरकार करण्याचें कारण नाहीं. पण त्या दोषांची दखल न घेतल्यास परीक्षण अगदींच एकाङ्गी केल्याचा आरोप माझ्यावर येण्याचा सम्भव आहे. म्हणून जातां-जातां दोषांकडेही अङ्गुलीनिर्देश करतों.

शशाङ्कांच्या भाषाशैलीनें रवीन्द्रांच्या पदचिन्हांचा हेतुतः अनुकार केलेला असला, तरी तीं पुष्कळ वेळां खट्याळ ओढाळपणानें गडकऱ्यांच्या मागोमाग जाण्याचा अजूनही प्रयत्न करते. त्यामुळें नादमधुर पण अर्थहीन शब्दांचा मोह तिला अजूनही आवरत नाहीं. असल्या काव्यात्म वातावरणाच्या नाटकांत आणि कथानकाच्या ऐन ओघांत कुमारानें झोडलेली देशभक्तीचीं व्याख्यानें अनाठायीं आणि निरर्थ वाटतात. त्यामुळें किती रसभङ्ग होतो यांची शशाङ्कांना कल्पना नसावी. जोंपर्यन्त बर्नार्ड शॉप्रमाणें हेतुविशिष्ट प्रश्नप्रधान नाटकें रवीन्द्रनाथ ठाकूर लिहीत नाहींत आणि

जोपर्यंत शशाङ्क रवीन्द्रांच्याच पदचिन्हांचा अनुकार करताहेत, तोंपर्यंत असल्या काव्यात्म नाटकांतून अकारण कोम्बलेलीं ( आणि ठराविक हेतूंचा अकारण आभास उत्पन्न करणारीं ) असलीं निरर्थ, शब्दबम्बाळ प्रवचनें केव्हांही अक्षम्य ठरणारच. शशाङ्कांच्या या नाट्यकृतींतली भाषाशैली काव्यात्म आहे पण नाविन्यात्म नाहीं. उपमादि अलङ्कार ज्या भाषेंत अभिव्यक्त केलेले आहेत ती भाषा सुन्दर आहे पण प्रायः ते सर्व अलङ्कार पारम्परिकच आहेत. मूळ अलङ्कारांत नाविन्य नाहीं. मूळ रवीन्द्रांच्याच ललितकृती प्रायः ज्या सर्वमान्य दोषांनीं डागळलेल्या आहेत त्या दोषांचा आरोप अनुकारकावर करणें उचित नाहीं, हें जाणून त्या इतर दोषांना अनुच्चारित ठेवणेंच अधिक श्रेयस्कर !

'शशिकला' ही नाट्यकृती लिहून शशाङ्कांनीं मराठी साहित्याच्या परिसरांत,एका अभिनव अशा वैभवशाली नाट्यविशेषाला प्रथमच प्रविष्ट केलें आहे. अद्यापपर्यन्त मराठी भाषेला सर्वस्वीं अपरिचित अशा या काव्यात्म नाट्यविशेषाचा अनुकार केल्याबद्दल कवि शशाङ्क निस्सन्देह अभिनन्दनास पात्र आहेत. नवीन साहित्य प्रान्तावर विजिगीषुवृत्तीनें आक्रमण करून, ते आत्मसात करून टाकण्याची आकाङ्क्षा ज्या तरुण महाराष्ट्रीय साहित्यिकांनीं हृदयांशीं बाळगली आहे, त्यांत कवि शशाङ्कांचा समावेश निस्संशय करावा लागेल.—'संन्यासी ' मालिनी ', ' त्याग ', ' राजा आणि राणी ', ' कच आणि देवयानी '— या कविश्रेष्ठ रवीन्द्रांच्या नाट्यकृतींत शशाङ्कांच्या ' शशिकले'ला नेऊन बसवलें तर, तें निखालस हास्यास्पद होणार नाहीं,— अशीच रसिक वाचक हें नाटक वाचून ग्वाही देतील, आणि ' हें ही नसें थोडकें ! '

नाशिक
ता० ३१ नोव्हेम्बर १९३४

' माधव मनोहर '

..." पण सूचना सुचवण्याचा स्नेहाचा अधिकार मला असला, तरी प्रस्तावना लिहिण्याचा, शिष्टपणाच्या हक्काचा अधिकार मला आहे कीं नाहीं, याबद्दल मी स्वतः बराचसा साशङ्क आहें.–माझ्या अधिकारांच्या मर्यादांची मला पूर्ण जाणीव आहे– म्हणून मी आपणास स्नेहभावानें असें सुचवितों कीं, एखाद्या साहित्यशिष्ट मिरासदार प्रस्तावना पण्डिताची नुसती 'बरें आहे, चाङ्गलें आहे, प्रयत्न उत्तेजनार्ह आहे,'– अशी टराविक ठशाची प्रस्तावना आपण मिळवूं शकलांत तर उभयतांच्या दृष्टीनें तेंच अधिक श्रेयस्कर !"......

नाशिक, ता. १०।८।३४                                  – माझें शशाङ्कांस पत्र.

..." मला कुणाही झब्बू साहित्यिकाची प्रस्तावना नको आहे. माझ्या अन्तःकरणाशीं समरस होऊं शकणाऱ्या माझ्याचसारख्या तरुणाची प्रस्तावना मला हवी आहे, आणि आपणच ती लिहिण्यास योग्य आहांत अशी माझी खात्री आहे.– तेव्हां निष्कारण कांहीं सबबी साङ्गण्याच्या भरीस न पडतां आपण लगेच प्रस्तावना लिहीण्यास सुरवात करावी."––

औन्ध, ता. ११।८।३४                                  – शशाङ्कांचें मला उत्तर

वाचक, आपणच निःप्पक्षपात बुद्धीनें निर्णय कराः–

मी ही प्रस्तावना लिहीली आहे खरी, पण मग यांत गुन्हा कोणाचा ?

—'माधव मनोहर'

# निवेदन

वायूच्या शीतल पण मन्द लहरीने तळमळणाऱ्या जीवाला अपूर्व शान्तीचा लाभ होतो. संसारदुक्खांत होरपळणाऱ्या जीवालाहि वाङ्मयाच्या योगानेंच समाधान प्राप्त होतें.

सन्ध्यासमयीं अङ्गणांत स्वैरपणें क्रीडा करणाऱ्या बालकांच्या खेळा-कडे वडील माणसें प्रेम व कौतुक या भावनेने पहात असतात. या माझ्या प्रथम नाट्यकृतीकडे त्याच भावनेने रसिकांनी पहावें. जरी ही नाटिका रवीन्द्रांच्या पद्धतीवर लिहिली असली तरी ती पूर्णपणें स्वतन्त्र आहे. मात्र कांही थोड्याच ठिकाणीं मी रवीन्द्रांच्या मनोज्ञ अलङ्कारांना मराठी साज चढविला आहे.

तिमिराकुल नभोमण्डलांत उदित तारकांचें सौन्दर्य नयनरम्य व चित्तवेधक असतें, पण अन्तीं तें तिमिरांत लोपून नामशेष होतें. मानवी आयुष्यांत लाभणारा आनन्द हा असाच क्षणभङ्गुर ठरतो, हेंच सत्य या नाटिकेंत रेखाटलें आहे. 'माधव मनोहर' यांनी आपलेपणाने प्रस्तावना लिहून दिली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें.

काय लिहूं आता ! निवेदन करावयाची मुख्य गोष्टच मला इथे निवेदन करतां येत नाही —आणि याला कारण परिस्थिति. तरी पण— ज्या व्यक्तीच्या लाभलेल्या अल्पकालीन सहवासानेच माझ्या जीवनांत क्रान्ति झाली तिच्या प्रेमळ स्मृतीस ही कृति मी सप्रेम अर्पण करतों.

औन्ध, २ जानेवारी १९३५ शशाङ्क

# अङ्क पहिला

[ विशालगडाखालील एक रमणीय उपवन. राजकन्या शशिकला शिलाखण्डावर बसून पुष्पमाला गुम्फीत आहे. सायङ्काळची वेळ. शशिकला एकटीच असून आपल्याशींच गाणें गुणगुणत आहे. ]

**शशिकला—** **—गीत—**

**दीप्त भानु मावळला। किरणपाश आवरुनी।**
**निशाहृदय भेदाया। पूर्णचन्द्र ये गगनीं॥ ध्रु०॥**
**धवल चन्द्रिका स्रवुनी। रजतमया हो अवनी।**
**फेर तारका धरुनी। रमती सुमधुर गानीं।**
**कुमुदबान्धवा बघुनी। प्रणयविद्ध हो रजनी॥ १॥**

( शशिकला गाणें गात असतांनाच कुमार प्रवेश करतो, व एका जवळच्या शिलातलावर बसून तिचें गाणें ऐकण्यांत तल्लीन होऊन जातो. गाणें सम्पल्यावर—)

**कुमार—** वः ! काय स्वर्गीय सङ्गीत हें ?

**शशिकला**— (दचकून मागे वळून पहाते) अगबाई ! कोण तें ?

**कुमार**— मी.

**शशिकला** — पण मी कोण ?

**कुमार**— मी ! एक प्रवासी आहें !

**शशिकला**— नेहमी असा उपवनांतूनच प्रवास करीत असतां वाटतं ?

**कुमार**— छेः ! छेः ! नेहमी राजमार्गानेच प्रवास करण्याची मला सवय आहे.

**शशिकला**— मग, आजच मार्ग चुकून उपवनांत कसें आलांत ?

**कुमार**— लाम्बच्या प्रवासाने श्रान्त झाल्यामुळे मी विश्रान्तीकरता उपवनाबाहेर एका वृक्षाला घोडा बान्धून तिथेच विश्रान्ती घेत पडलों होतों. पण आपलें मधुर सङ्गीत कानावर आलें आणि व्याधगीताने लुब्ध झालेल्या कुरङ्गाप्रमाणे मी नकळत इथे ओढला गेलों.

**शशिकला**— अगबाई ! बरेच साळसूद दिसतां ? म्हणे नकळत इथे ओढला गेलों ! परक्याच्या उपवनांत परवानगीशिवाय प्रवेश करणें हा गुन्हा होतो हें ठाऊक नाहीं वाटतं ?

**कुमार**— कमलगन्धाने मोहित होऊन भ्रमराने कमलिनीकडे धाव घ्यावी यांत दोष कुणाचा ? भ्रमराचा का कमलिनीचा ? अशा या रम्य सायङ्काळीं मन्द वायूच्या झुळुकीबरोबर गाण्याचे गोड आलाप कानावर आले म्हणून मी शोध घेत घेत इथे आलों.

**शशिकला**— गाण्याचें बरेच वेड दिसतें आपणाला ?

**कुमार**—असलें गायन ऐकावयास मिळाल्यास वेडा कोण होणार नाही ? आपल्या मधुर सङ्गीताने या उपवनांतील कोकिलादि सर्व पक्ष्यांचीं गाणीं कण्ठांतच थिजून गेलीं आहेत. अगोटीच्या सुमारास मृत्तिकेचा मत्तगन्ध सभोवार दरवळतो आणि त्यायोगें जीव किञ्चित्काल धुन्द होतो तशी आपलं गायन ऐकून माझी स्थिति झाली आहे.

**शशिकला**— ओळख देख नसताना परक्याच्या बागेंत अनाहूत प्रवेश करतां आणि अनोळखी कुमारिकेशीं शिष्टाचार सोडून अघळपघळ सम्भाषण करतां, हें आपल्यासारख्यांना शोभून दिसत नाही !

**कुमार**— शोभून दिसणारीच गोष्ट मी करावी, अशी माझ्याबद्दलची कळकळ अनोळखीपणींच आपल्या अन्तःकरणांत का बरं उद्भूत झाली ?

**शशिकला**— स्त्रियांच्या सहज बोलण्याचा भलताच अर्थ करण्याची सवय पुरुषांना फार !

**कुमार**— भलता नसला तरी स्वतःला उपयुक्त असा अर्थ आम्ही खास करून घेतों.

**शशिकला**— आपण बोलण्यांत चतुर, मार्मिक आणि धीट दिसतां ! आपलं नांव तरी काय ?

**कुमार**— कुमार.

**शशिकला**— ( दचकते ) काय कुमार ?

**कुमार**— का ? एवढं दचकायला काय झालं ?

**शशिकला**— प्रसिद्ध रणधुरन्धर आणि द्वन्द्वयुद्धांत अद्वितीय ठरलेले चन्द्रगिरीचे राजकुमार आपणच का ?

**कुमार**— होय तोच मी.

**शशिकला**— विरलमेघमण्डळांतून चन्द्रकला दृग्गोचर व्हावी त्याप्रमाणे आपल्या बोलण्याचालण्यांत वीरता तेजस्वितेने व्यक्त झालेली दिसून येते. तरीच म्हटलं केवळ सङ्गीताच्या लहरीवर तरङ्गत नकळत या उपवनांत निर्भयपणें प्रवेश करण्यास तुम्ही कसें धजलांत ? माझं सङ्गीत ऐकलंत; आता आलांत तसे परत जाणार असालच ?

**कुमार**— परत ? ते का म्हणून ? इथं आलों तो काय परत जाण्याकरता ?

**शशिकला**— अगबाई ! या उद्यानांत परवानगीवांचून प्रवेश करून पुन्हा जाणार नाही म्हणतां ? छेः ! मीच इथं आलें नसतें तर बरं झालं असतं ! तुमचा माझ्यामागचा ससेमिरा तरी सुटला असता! मी आपली इथून जातेंच कशी ?

**कुमार**— ( बाजूस पाहून ) अरेच्या घोडा सुटला वाटतं ?

( कुमार उठतो व बाहेर जाण्याचा अविर्भाव आणतो )

**शशिकला**— ( कुमाराला थाम्बविण्याच्या उद्देशाने ) कुमार !

**कुमार**—( वळून ) काय म्हटलंत ?

**शशिकला**— ( चाचरत ) मी कधी हाक मारली ?

**कुमार**— मला तसा भास झाला. क्षमा करा.

( बाहेर जाण्याकरता पुन्हा वळतो )

**शशिकला**— (काकुळतीस येऊन) कुमार !

**कुमार**-- ( हसतो व परत फिरतो ) काय ?

**शशिकला**— ( लाजते ) इथं विशाळगडीं का येणं केलंत ?

**कुमार**-- महाराज विक्रमसिंहांची भेट घेण्याकरता मुद्दाम मी इथं आलों आहे.

**शशिकला**-- ( आश्चर्याने ) त्यांच्याकडं काय काम ?

**कुमार**— आमचा चन्द्रगिरी हा प्रांत हल्ली राजे विक्रमसिंह यांच्या ताब्यांत आहे. वास्तविक परवापर्यंत शतकानुशतकें आम्ही कुणाचेहि ताबेदार अगर माण्डलीक नव्हतों. आम्ही संपूर्ण स्वातन्त्र्याचा उपभोग घेत होतों. पण पन्धरा वर्षांपूर्वी मी केवळ आठ वर्षांचा असतांना माझे बाबा वारल्यावर आमचा चन्द्रगिरी प्रान्त विक्रमसिंहांनी पादाक्रान्त केला. तेव्हापासून आम्ही गुलामगिरीच्या रौरवनरकांत पिचत आहोंत. मी आमचं हिरावून नेलेलं स्वातन्त्र्य

परत मागण्याकरिता प्रथमच विशाळगडीं आलों आहें. चन्द्रागिरीच्या राजपुत्राला गुलामगिरींत खितपत पडणं मुळीच मानवत नाही.

**शशिकला**— पण स्वातन्त्र्य असं मागून मिळत नसतं! त्याकरिता प्राणान्त दिव्य करावं लागतं!

**कुमार**— कोणतंहि दिव्य करण्यास हा कुमार एका पायावर तयार आहे. सत्य आणि माझं सारं राष्ट्र मला साहाय्य करण्यास तयार असतांना या कुमाराला जगांत अशक्य असं काय आहे? उदित सूर्य प्रातःकालीन दाट धुकें लुप्त करून टाकतो तद्वत् माझा आत्मविश्वासहि गुलामगिरीचीं बन्धनें सहज नष्ट करून टाकील. प्रसङ्ग आल्यास अस्मान्च्या बिजलीप्रमाणे चमकणाऱ्या या तलवारीचें पाणी मी दाखवल्याखेरीज राहणार नाही.

**शशिकला**— आपल्या ठिकाणीं धडाडी व आत्मविश्वास तरी जबरदस्त दिसतो पण विक्रमसिंह महाराजांच्या हातून स्वातन्त्र्य प्राप्त करून घ्यायचं म्हणजे सुसरीनं गिळलेलं माणिक बाहेर काढण्याइतकं हें काम अवघड आहे हें विसरून चालणार नाही. मला तर हें काम अशक्य वाटतं.

**कुमार**— ( हसून ) अशक्य! अशक्य ही कल्पना या कुमाराच्या मनाला स्पर्शसुद्धा करीत नाही. बालपणापासून हृदयाशीं बाळगलेल्या या महत्त्वाकाङ्क्षेची पूर्तता केल्याखेरीज हा कुमार कधीहि स्वस्थ बसणार नाही.

**शशिकला**— पण विक्रमसिंह महाराजांनी स्वातन्त्र्य न दिलें तर?

**कुमार**— आम्ही तें हिसकावून घेऊं. तशी माझी व माझ्या प्रजाजनांची प्रतिज्ञा आहे. शारिरीक व आत्मिक बलाने आम्ही आमचं गतवैभव व स्वातन्त्र्य प्राप्त करून घेणार. महाराजांची भेट घेऊन आमची न्याय्य मागणी रीतसर त्यांच्या कानावर घालणार. माझ्याबरोबर माझे प्रजाजनहि आले आहेत. विक्रमसिंह आमच्या

मागणीचा खात्रीने योग्य विचार करतील असें त्यांच्या आतापर्यंतच्या उदार वर्तणुकीवरून म्हणावयास हरकत नाही.

**शशिकला**— ( निश्वास टाकून खिन्नपणाने ) आपणाला या उद्दिष्ट कार्यांत यश मिळो.

**कुमार**— (मिस्किलपणें हसून) पहिल्याच भेटींत आपल्या ठिकाणीं माझ्याबद्दल इतका आपलेपणा उत्पन्न झाला हा मी एक शुभशकुनच समजतों.

**शशिकला**— (त्याच्याकडे रोखून पाहून) आलांत पुन्हा वळणावर ?

**कुमार**— मी निघालों असतांना मला हाक मारून कशाला थाम्बवलत ?

**शशिकला**— चुकलें मी.

**कुमार**— थाम्बवून पुन्हा वर प्रश्नहि विचारलेत ?

**शशिकला**— चूक झाली माझी.

**कुमार**— आणि परत मलाच वर दोष देतां ?

**शशिकला**—( काकूळतीस येऊन ) चुकलें म्हणते ना मी ?

**कुमार**— पण मी कुठं म्हणतोय आपण चुकलांत म्हणून ? आपण केलं तें योग्यच केलं !

**शशिकला**— कुमार ! तोण्ड फार सुटूं लागलं बरं ! आपली माझी ना ओळख ना पाळख. छे ! जाच तुम्ही येथून. क्षणभरसुद्धा राहूं नका माझ्या दृष्टीपुढं !

**कुमार**— वज्रासारख्या कठीण लांकडाचें क्षणांत चूर्ण करणारा भ्रमर कमलांत आडकल्यावर त्या नाजूक बन्धनांतून मुक्त होणं त्याला अशक्य होतं. शिवाय या कमलदलाप्रमाणे असणाऱ्या रक्ताधरांतून स्रवणारें मधुर हास्य व नयनशलाकेंतून पाझरणारा आनन्द सेवून धुन्द झाल्यावर या सुखाचा त्याग कुणाला बरं करवेल ?

**शशिकला**-- कुमार ! आपण काय बोलत आहांत याची आपणा स्वतःस कल्पना तरी आहे का ? बोलण्यानं बोलणं वाढतं. अग्नीने अग्नि पेटविला जातो.

**कुमार**— तसं प्रेमानं प्रेमहि वाढविलं जातं.

**शशिकला**— केवळ प्रेमानं प्रेम नाही कांहीं वाढत ! प्रेम उत्पन्न व्हावयाला सहवासाची व एकविचारांची आवश्यकता असते.

**कुमार**— छट् ! मुळींच नाही. विरोधानं प्रेम उत्पन्न होतं व प्रमोद्भवानन्तर सहवासाची तीव्र जरूरी भासूं लागते. अरे पण ! बोलण्याच्या भरांत तिन्हीसांजा टळून गेल्या. माझे सोबती माझी उत्कण्ठेने वाट पहात असतील. तेव्हा मला आता गेलच पाहिजे.

**शशिकला**— वसन्तकालीं अकल्पित वर्षणाऱ्या पर्जन्याप्रमाणे आपण आलांत--

**कुमार**— ( उठून ) आणि नाइलाजानं तसाच निघालोंहि.

**शशिकला**— आपणाला माझ्या वटवटीने विश्रान्ती मुळीच मिळाली नाही, उलट त्रास मात्र झाला असेल.

**कुमार**— प्रातःकाळीं फुललेल्या पारिजाताचीं फुलें खाली पडतात. पारिजाताला त्याबद्दल कल्पनाहि नसेल पण ज्याच्यावर तीं पडतात त्याला मात्र अत्यानन्द हाता खास. आपली व माझी ओळखदेख नसतांहि माझ्या बोलण्याचा राग न धरतां उलट मात्र मजबद्दल सहानुभूति व्यक्त केलीत. किती भाग्यशाली आहें मी ? शीतल वायुलहरींतील सायङ्कालीन दीपज्योतीप्रमाणे आपल्या कोमल अधर प्रान्तावर थरारलेलें हास्य माझ्या अङ्गीकृत कायास शुभशकून ठरो. येतों मी आता !

( तो जातो. शशिकला व्याकूळ नजरेने त्याच्याकडे पहाते )

**( पडदा पडतो )**

---

# अङ्क दुसरा

[ शशिकलेचा महाल. राजकन्या शशिकला व तिची सखी मन्दाकिनी बोलत बसल्या आहेत. ]

**मन्दाकिनी**-- ताईसाहेब ! आज आपल्या कपोलावर अरुणाने लपण्डाव का बरं चालविलेला दिसतो ? आपल्या मृगलोचनांत आज कातर भाव उदित का बरं झाले ? विशाळगडच्या विक्रमसिंहाची वीरकन्या आज कावरीबावरी का बरं झाली ?

**शशिकला**— काय साङ्गूं नि कसं साङ्गूं ? ज्या माझ्या हृदयाला आजपर्यंत अस्थिरतेचा लेशहि ठाऊक नव्हता तेंच हृदय अज्ञात व अननुभूत सुखानुभवांनी स्पन्दन पावल्याने मला असहाय्य झाल्यासारखं वाटत आहे. स्त्रीसहजभीरुता अगर कोमल भावना आजपर्यंत मला अज्ञात होत्या पण आज मी अबला आहें याची जाणीव माझ्या हृदयांत उद्भूत झाली आहे. मन्दाकिनी ! आज मी दीन झालें आहें. बांवरलें आहें, भयभीत झालें आहें.

**मन्दाकिनी**— खरंच ताईसाहेब ! आजपर्यंत भय म्हणजे काय हें आपणास माहीत नव्हतं ! धनुष्याला प्रत्यञ्चा चढवावी, घोड्याला टाच मारावी व शिकार करावी यांत आपलं आतापर्यंतचं आयुष्य व्यतीत झालं. वन्य श्वापदांशीं झुञ्ज खेळतांना भीतीचा लवलेशही आपल्या हृदयाला कसा तो ठाऊक नव्हता. असं असतांना आजच ताईसाहेब अशा व्याकूळ का बरं झाल्या आहेत ?

**शशिकला**— भ्रुकुटींचे चाप सज्ज करून त्यांतून नयनशर वर्षून दुसऱ्यांचं हृदय विद्ध करावं अशी भावना माझ्या हृदयांत का बरं उत्पन्न व्हावी ? छे: ! माझंच हृदय आज विद्ध झालं.

**मन्दाकिनी**— चन्द्रोदयाने कमलिनी प्रफुल्लित होते. वसन्तागमाने कोकिलेला मधुर कण्ठ फुटतो. बालिकेने यौवनांत पदार्पण केलें की, पञ्चबाणाचा खेळ सुरू होतो. खचित ! आज आपल्या हृदयांत पुष्पधन्व्याचा जन्म झाला आहे. स्त्रीजातीला सहज असे कोमल भाव आपल्या नाजुक हृदयांत जागृत झाल आहेत. जोपर्यंत हे भाव आपल्या हृदयांत उत्पन्न झाले नव्हते तोपर्यन्त आपण अजिङ्क्य होता पण आता आपण जित होण्याच्या मार्गाला लागला आहांत.

**शशिकला**— मन्दाकिनी ! पुरुषांप्रमाणे मी धनुर्विद्या शिकलें, राज्यकारभाराचें थोडेंफार ज्ञानहि करून घेतलें पण आज माझ्या ठिकाणीं स्त्रीपणाची जाणीव उत्पन्न झाली. गर्द आणि निर्जन अरण्यांतून क्रूर सिंहाच्या मागून घोडदौड करतांना ज्या माझ्या हृदयाला प्रतिक्षणीं अधिकाधिक आनन्द आणि उन्माद वाटावयाचा तेंच माझें अभेद्य आणि अजिङ्क्य हृदय असंवेद्य भावनेनं कातर झालं. माझ्या हृदयाला तुझ्यावांचून कोण बरं धीर देणार ?

**मन्दाकिनी**— ताईसाहेब ! सुमनदलाच्या अग्रावरील दवबिन्दूप्रमाणे आपल्या अर्धोन्मीलित पापण्यावर मधुर लज्जा प्रतीत होत

आहे. उषेच्या आगमनाने कलिका उमलूं लागते. सृष्टीमाता त्या कालिकेला दंव पाजते आणि प्रभाकराच्या उदयानें ती कलिका प्रफुल्लित होते. ताईसाहेब ! आपली तारुण्यकलिका कुणाच्या दर्श-नाने प्रफुल्लित झाली आहे ?

**शशिकला**— त्यांनी क्षुधित नेत्रांनी मजकडे पाहिलं. माझ्या अन्तःकरणांतल्या गुप्त धनाची याचना केली आणि अननुभूत सम्वे-दनांनी माझं हृदय अस्थिर झालं. माझ्या हृदयसरोवरांत अज्ञेय स्नेहल सम्वेदनातरङ्ग उद्भूत झाले. कुमार आले नि गेले—पण माझं हृदय मात्र मी गमावून बसलें !

**मन्दाकिनी**— कोण कुमार ? चन्द्रगिरीचे युवराज की काय ?

**शशिकला**— हो ! समरधुरन्धर कुमार आले आणि माझ्या हृदयसागरांत तुफान उत्पन्न करून गेले.

**मन्दाकिनी**— त्यांची आपली कुठं भेट झाली ?

**शशिकला**— कालच उपवनांत. ते किती सुंदर आहेत ! त्यांचं बोलणं तरी किती आकर्षक, मार्मिक आणि गोड आहे म्हणून साङ्गूं !

**मन्दाकिनी**— तरीच म्हटलं आज आपल्या अधरप्रान्तावर लज्जेच्या नवथर लहरी अन् गालांवर खळ्यावर खळ्या का बरं उमटूं लागल्या आहेत ? ताईसाहेबांचं अभेद्य हृदय अस्थिर आणि अज्ञेय भावनेनं कातर झालं हा सारा मीनकेतनाचाच प्रताप.

**शशिकला**— मधुर गन्धाने भरलेल्या अर्धस्फुट कलिकेसारखं असलेलं त्यांचं मुखकमल चिरकाल समोर असावं असं वाटतं. वासन्तिक शशाङ्कज्योत्स्नेप्रमाणे त्यांचें भाषण किती आल्हाद-दायक नि गोड म्हणून साङ्गूं ? त्यांचं हास्य म्हणजे किन्नर कण्ठांतील सुरेल लकेरच. त्यांच्या प्रत्येक शब्दांत आत्मविश्वास तरी किती जबर ! पण त्यांचा सहवास कमलपत्रावरील जलबिन्दू-प्रमाणे क्षणभङ्गूर ठरला.

**मन्दाकिनी**— मदनाचा बाण म्हणजे अग्नीची ज्योतच. ईप्सित प्राप्ति न झाल्यास मदन-बाणाने विद्ध झालेलं हृदय अधिकाधिक पीडित होतं. पुष्पधन्व्याकडून अविद्धच राहिलेलं बरं नाही का ?

**शशिकला**— पञ्चबाणाकडून हृदय अविद्ध राहण्यापेक्षा विद्ध होऊन भग्नहृदयी होणं बरं !

**मन्दाकिनी**—(हसून) पण कुमारांची व आपली भेट कशी झाली ?

**शशिकला**— उपवनांत मी स्वतःशींच गीत गुणगुणत होतें. त्या गीताचे स्वर ऐकून कुमार गीतलहरीवर तरङ्गत उद्यानांत आले. त्यांचं तें मुग्ध भावनेनं भारावलेलं मुखकमल, हसून बोलणं, खट्याळ नजर, या योगानं मी तर गांगरूनच गेलें. त्यांच्या धाष्टर्याने मी चकित झालें. त्यांच्यावर रुष्ट दृष्टीक्षेप करून रागाने बोलावं म्हणून मी कितीदा तरी प्रयत्न केला पण त्यांच्याकडं पाहिलं की नेत्रांत लज्जा आणि भाषणांत माधुर्य अकारण उत्पन्न होई. त्यांच्या विलग ओठांतून मधुर हास्य चमकलें की माझा जीव खालवर होत असे.

**मन्दाकिनी**—( खट्याळपणाने ) ताईसाहेब ! यावेळीं आपला मुखचन्द्र किती मनोहर दिसत आहे ? शुभ्रलोकरी ढगांमधून चन्द्र स्मित वदनाने धवल सुधाकिरणांचा वर्षाव करतो त्याच-प्रमाणे भावमधुर स्मृतिपटलामधून आपला मुखचन्द्र आनन्द किरणांचा वर्षाव करीत आहे. आपलं अन्तःकरण मधुर भावनेने ओसण्डून गेल्याने आपल्या भोवती आनन्दाची प्रभा फांकली आहे.

**शशिकला**— ( गंभीर होऊन ) पण मन्दाकिनी ! कुमारा-विषयी माझ्या हृदयांत प्रेमाङ्कूर उद्‌भूत झाला यांत मी चुकलें तर नाही ना ? माझ्या अन्तःकरणांत मला मधून मधून विनाकारण हुरहूर का बरं लागावी.

**मन्दाकिनी**— कारणाशिवाय हुरहूर लागणं हें प्रेमातिशयाचंच

लक्षण आहे. पण ताईसाहेब ! कुमार आणि प्रेम या दोन गोष्टींचं साहचर्य महाराजांना पसन्त नाही पडायचं !

**शशिकला**— ( निश्वास टाकून ) हं ! पुरुषांची दृष्टी ध्येयावर केन्द्रीभूत झालेली असते. स्त्रियांच्या भावनेकडे पाहण्यास त्यांना अवसरहि नसतो. आपल्या इच्छेच्या आड मुलींचें प्रेम आलें, तरी त्याला लाथाडून देण्यास बाबा कधींच मागेपुढे पहाणार नाहीत. शिवाय इच्छित वस्तु जर अशी सहजासहजीं प्राप्त होऊं लागली तर आयुष्यांतील सुखानन्दाचें महत्त्व कमी नाही का होणार ?

( सारङ्गनयना प्रवेश करते ).

का ग सारङ्गनयने ! कुठं होतीस ग इतका वेळ ?

**सारङ्गनयना**—- आपणच नव्हतं का मला दरबारची हकीकत काढून आणण्यास लावून दिलंत ?

**शशिकला**—- खरं विसरलेंच मी ! दरबारांत काय हकीकत घडली ? बाबांचं आणि कुमारांचं बोलणं झालं का ?

**सारङ्गनयना**—- हो ! कुमारांचं व त्यांच्या प्रजाजनांचं सारं म्हणणं महाराजांनी शान्त चित्तानं ऐकून घेतलं.

**शशिकला**— ( उत्सुकतेने ) मग बाबांनी कुमारांचं राज्य परत देण्याचं आश्वासन दिलं का ?

**सारङ्गनयना**— आपल्या विनंतीचा आम्ही विचार करूं व लवकरच आपणाला काय तो निकाल कळवूं म्हणून साङ्गितलं.

**शशिकला** — ( निश्वास टाकून ) ज्वालामुखींतून एकवेळ हिम-नदीचा उगम होईल पण बाबांच्या हातून राज्य सुटणं अशक्य आहे. वयाबरोबर त्यांची अघोर राज्यतृष्णाहि वाढूं लागली आहे. त्यामुळे युक्तायुक्त, सत्यासत्य, इष्टानिष्ट यांतील भेदहि त्यांना कळे-नासे झाले आहेत. बरं पण कुमार कुठं आहेत ?

**सारङ्गनयना**— कुमार गेले चंद्रगिरीला परत. महाराजांचं हें सान्दिग्ध उत्तर ऐकून त्यांना किञ्चित रोष आला आणि ते आपल्या प्रजाजनांसह तातडीने चन्द्रगिरीला निघून गेले.

**शशिकला**— कुमार निघून गेल्यावर बाबा कांही बोलले का?

**सारङ्गनयना**— महाराज एक शब्दहि बोलले नाहीत.

**शशिकला**— मला वाटलंच तसं. बाबांचं अन्तःकरण कुणाला कळून यायचं नाही. त्यांच्या हृदयांत चाललेली खळबळ ते कधीहि व्यक्त करीत नाहींत. भावनावशतेला ते पारखे आहेत. आपल्या इच्छेप्रमाणे अगर इच्छेविरुद्धहि घडणाऱ्या गोष्टीने त्यांची बाह्य शान्ती तिळमात्र ढळत नाही, वाणींतील गोडी कमी होत नाही. बाबा काय उत्तर देणार तें दिसतंच आहे! मन्दाकिनी! पालवलेली आशावेल वठून गेली. क्षणापूर्वी मधुरस्मिताची मृदुरेषा ज्या अधरप्रान्तावर चमकली तोच अधरप्रान्त दुःखाने थरथरूं लागला.

**मन्दाकिनी**— मानवी जीवन हें आशानिराशेनें भरलें आहे. सुखाचा एक अमृतबिन्दू चाखण्यापूर्वी विषाचे अनेक प्याले प्राशन करावे लागतात.

**शशिकला**— विषाचे प्याले मी आनंदाने प्राशन करीन पण त्या अमृतबिन्दूची प्राप्ति मला कोण करून देणार?

**मन्दाकिनी**— ताईसाहेब! असा विषाद मानून कसं चालेल? धीर धरा. आहे या परिस्थितींतूनच मार्ग निघून इच्छित मनोरथ पूर्ण होतील. आपल्या हृदयाच्या हाकेला स्मरून कृति करा. भीरुतेचें अवगुंठण बाजूला सारा. भीरुता गेली तरच यशःश्री पदक्षेप करते.

( पडदा पडतो ).

---

# अङ्क तिसरा



[ घोर अरण्यातील पडकें शिवालय ]

**शशिकला**—— मन्दाकिनी ! शिकारीचा पाठलाग करीत आपण किती दूरवर आलों, नाही ? आता इथं थोडी विश्रान्ती घेऊं या. मी तर अगदी गळून गेलें आहे बाई !

**मन्दाकिनी**— हें स्थान किती रम्य आहे नी ( इकडे तिकडे पाहून ) अगबाई शिवालय दिसत आहे ! विश्रान्ती घ्यायला योग्य स्थान आहे हें.

( दोघीहि शिवाला भक्तीभावाने वंदन करतात )

**शशिकला**—— मन्दाकिनी ! विश्रान्ती घेण्यापूर्वी त्या पलीकडच्या वेलीवरचीं चार फुलं तरी घेऊन ये. म्हणजे देवाची पूजा बान्धूं आणि मगच विश्रान्ती घेऊं.

**मन्दाकिनी**— ताईसाहेब, अलीकडे आपणाला देवधर्म फार आठवूं लागलेत ? भोळ्या शङ्कराला प्रसन्न करून इच्छित वरप्राप्ति करून घ्यायची ही पूर्वतयारी आहे वाटतं ?

**शशिकला**— ( मन्दाकिनीच्या गालावर प्रेमाने पण कृतक कोपाने

चापट मारून ) चल चहाटळ कुठली ! ( मन्दाकिनीला ढकलते ) अगोदर जाऊन फुलं आण पाहू !

( मन्दाकिनी हसत हसत जाते. शशिकला धनुष्य, भाते, तलवार वगैरे सर्व आयुधें काढून एका शिलातलावर ठेवते. इतक्यांत मन्दाकिनी फुलें आणते. दोघीहि जवळच्या ओढ्यावर हातपाय धुऊन शङ्करापुढे येतात. शशिकला शङ्कराला फुलें वाहाते व गुडघे टेकून वन्दन करते. मन्दाकिनी शङ्करास फुलें वाहाते. इतक्यांत चन्द्रसेनासह कुमार प्रवेश करतो. शशि-कला लतेआड लपते. )

**कुमार**— शेवटीं इतक्या वेगाने पाठलाग करूनहि वाघिणीने हातावर तुरी दिलीच. शिकार कुठं लपली हेंहि कळत नाही.

**चन्द्रसेन**— शिकारीच्या शोधांत आपले लोक सोडून आपण इतक्या दूर अशा निर्जन प्रदेशांत येऊन पोहोंचलों आणि शिकारहि गमावून बसलों.

**कुमार**— शिकार जाते कुठं ? या कुमाराचे हातून शिकार निसटली असं होणं अशक्य आहे. इथंच कुठं तरी आसपास दडून बसली असेल.

**मन्दाकिनी**— डोळे असून पहावयाचं नाही. कान असून ऐकायचं नाही मग जवळची शिकार तरी कशी दिसणार ?

**कुमार**— ( दचकून वळून पाहतो ) कोण ! मन्दाकिनी ! तू इकडं कुणीकडं.

**मन्दाकिनी**— जिथं ज्योत तिथं छाया. जिकडे ताईसाहेब तिकडे मी.

**कुमार**— कोण शशिकला कुठं आहे ती ? ( इकडे तिकडे पाहतो. वेलीच्या आडून शशिकला हसते )

**चन्द्रसेन**— कुमार खऱ्या शिकारीचा पाठलाग करीत असतां भलतीच शिकार सापडली.

**मन्दाकिनी**— पण पारध्याने शिकार करण्याऐवजी शिकारीनेच पारध्याची पारध केली. ( शशिकला लाजते )

**चन्द्रसेन**— तरी देखील पारध्याला खेद न होतां आनन्दच होत आहे.

**मन्दाकिनी**— ही तर जगाचीच रीत आहे.

( एकमेकांकडे पाहून हसतात )

**शशिकला**— ( पुढे येऊन ) मन्दा ! फार फाजील झालीस. जिभेला हाड तरी आहे का ?

( मन्दाकिनी हसते. तिरप्या नजरेने एकदा शशिकलेकडे व एकदा कुमाराकडे पाहाते. थोडावेळ कुणी कांहीच बोलत नाही. )

**कुमार**— मन्दाकिनी ! का मुग्धता धरलीस ?

**मन्दाकिनी**— उषेच्या आगमनाने तारकांचं तेज लुप्त होतं.

**शशिकला**— ( खोचून ) पण चन्द्रोदयाने तारका आनन्दाने नाचूं लागतात.

**चन्द्रसेन**— सर्वस्वाचा त्याग करून केवळ उषेकरता सूर्य अंतराळांतील अन्धारी मार्ग वेगाने आक्रमण करतो.

**कुमार**— ( हसून ) हो करतो. मग तुझं म्हणणं काय ?

**चन्द्रसेन**— त्यावेळीं तारानाथाला मुकाट्याने निस्तेज व लुप्त व्हावं लागतं. ( जावयास निघतो )

**मन्दाकिनी**— आणि त्याबरोबर तारकेलाहि लुप्त व्हावं लागतं.

( मन्दाकिनी हसत हसत चन्द्रसेनामागून जाते. शशिकला व कुमार बराच वेळ आळीपाळीने एकमेकांकडे पाहतात व चोरून हसतात. )

**कुमार**— आपल्या लज्जावनत मुखकमलाच्या स्मितमधुसाठीं हा कटाक्षभृङ्ग फार उतावीळ झाला आहे.

**शशिकला**— ( दुसरीकडे पाहून ) पुरुषांचीं हृदयें निव्वळ वज्राचीं बनविलेलीं असतात.

कुमार— मग पञ्चबाणाला वज्राचीं हृदयें विव्हल करतां आलीं नसतीं ?

शशिकला— मन्मथ शर फुलाहून नाजूक आणि वज्राहून कठोर आणि तीक्ष्ण असतो.

कुमार— फुलल्या फुलांनी केशकलाप सजवावा हें केशकलापाचं भाग्य. रमणीच्या वाक्पुष्पांनी हृदय सजवावं हें पुरुष-हृदयाचं भाग्य.

शशिकला— अलङ्कारावाचून आपलं बोलणं नाही ?

कुमार— ललना अलङ्काराच्या भोक्तया म्हणून तर मलाही त्यांचा उपयोग करावा लागतो.

शशिकला— पण कुमार! युद्ध सुरू असता शिकारीला यायची आपणाला सवड कशी झाली ?

कुमार— तूर्त शिकार करण्यास मला क्षणाचीहि फुरसत नाही; पण तू याच अरण्यांत आज शिकारीस आली आहेस अशी बातमी माझ्या हेरांनी मला दिली तेव्हा केवळ तुझी भेट घेण्याकरता मी इकडेच शिकारीस आलें.

शशिकला— पण ही बातमी बाबांच्या कानावर गेली तर त्यांच्या रागास पारावार राहणार नाही. मी माझ्या स्वातन्त्र्याचा असा फायदा घेतलेला त्यांना मुळींच आवडणार नाहीं.

कुमार— खरंच नाही आवडणार त्यांना हें. प्रत्येकाला आवडणारी गोष्ट आपण करूं असें म्हटलें तर तें अशक्य आहे. कारण कोणतीहि गोष्ट एकाला आवडली तर दुसऱ्याला ती नावडती होते. शशाङ्काची धवल चन्द्रिका प्रेमी जनांना आल्हाददायक असते तर विरही जनांना तीच दुस्सह होते.

शशिकला— आपण कांही म्हटलंत तरी यापुढ आपली माझी भेट होणं आपल्या हिताच्या दृष्टीन इष्ट नाही. दोन महिन्यापूर्वी

आपली उपवनांत भेट झाली तेव्हापासून शिकारीच्या निमित्ताने आपल्या अनेकवार भेटी झाल्या; ही गोष्ट बाबांच्या कानावर गेल्यास त्यांच्या अङ्गाचा भडका उडेल आणि त्यांत दोघांचीहि – निदान झी – आहुती पडावयास वेळ लागणार नाही. तेव्हा यापुढं—

**कुमार**— वासन्तिक मन्द वायूची आल्हाददायक झुळूक नवोत्साह उत्पन्न करते तद्वत् तुझ्या दर्शनानेहि माझ्या ठिकाणीं नवोत्साह उत्पन्न होतो. स्त्री ही पुरुषांची स्फूर्तिदेवता आहे.

**शशिकला**— पण या देवतेच्या दर्शनाने स्फूर्ति उत्पन्न होऊन तिच्यायोगें गेल्या दोन महिन्यांत झालेली प्राणहानी पाहून माझं हृदय दुभङ्ग होऊन जातं. आमच्या प्रचण्ड सैन्यबळापुढ आपलं व आपल्या मूठभर चमूचें कांही चालत नाही. पण त्याच वेळेला आपल्या युद्धकौशल्याने आमच्या सैन्याची फार प्राणहानी होत आहे. या स्वातन्त्र्ययुद्धांत होणारी ही प्राणहानी पाहून मन फार उद्विग्न होतें. बाबांच्या हट्टी आणि एककल्ली स्वभावामुळे ते माघार घेण्याची गोष्टसुद्धा काढीत नाहीत. निदान आपण तरी माघार घेऊन अन्य साधनांनी कार्यभाग साधावा.

**कुमार**— माघार ! या कुमाराला स्वातन्त्र्यापुढे कोणतीहि गोष्ट अधिक मोलाची नाही. या स्वातन्त्र्यहोमांत जिवाचं बलिदान करण्याकरता तळहातांवर शिर धरूनच मी युद्धास तयार झालों आहें. संपात्ति आणि सामर्थ्य यांच्या बळावर कांही काळ तुम्ही आम्हांला ८ाद देणार नाही पण शेवटीं सत्याचाच जय होईल !

**शशिकल**— बलवान् राजसत्तेशीं मूठभर लोकांनी झुंज खेळणें म्हणजे मदोन्मत्त हत्तीने हिमालयांतील प्रचण्ड पहाडाशीं टक्कर देण्यासारखें आहे. यांत आपली सत्ता, नांव, देश आणि सर्व कांही नामशेष होण्याचा प्रसङ्ग येईल.

**कुमार**— ( हसून ) गुलामगिरीच्या नरकांत पिचत राहण्यापेक्षा

युद्ध खेळून नामशेष झालेलं काय वाईट ? त्यायोगाने साऱ्या जगांत आमच्या स्वातन्त्र्ययुद्धाचा यशोदुन्दुभी तरी सदैव निनादत राहील ! शशिकले ! राजसत्ता अन्ध आणि पापी झाली -- राजाच्या शब्दाप्रमाणे राजसेवक न्याय देऊं लागले -- राजाच्या पापी शब्दालाहि देवाच्या पुण्य शब्दांचें महत्त्व आलें की लोकसत्तेनं बण्डाचं निशाण उभारलंच पाहिजे. पापी राजसत्ता कितीही बलवान असली तरी तिचा शेवटीं पाडाव होतो, असा जगाचा इतिहास साक्ष देतो आहे.

**शशिकला**— जुलमी आणि शक्तिमान् राजसत्तेशीं टक्कर देतांना सर्वस्व गमावून बसलेल्या अनेक देशांचीं उदाहरणें हीं आपणाला दाखवितां येतील. मग स्वातन्त्र्य गमावून नामशेष होण्यापेक्षा पारतन्त्र्यांत राहूनसुद्धा देशाचें वैभव वाढवितां येणार नाही का ?

**कुमार**— शशिकले ! तूं चतुर आणि सूज्ञ असूनहि माझ्याशीं असा युक्तिवाद करीत बसतेस ? परतन्त्र राष्ट्रांत दारिद्य, अज्ञान व स्वार्थ बोकाळतो हे स्वानुभवाने मी साङ्गतों. परतन्त्र राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीचा तेजोवध करण्यांत येतो. परतन्त्र राष्ट्रांत लक्ष्मी आणि सरस्वती यांचें वास्तव्य असत नाही. उलट स्वतन्त्र राष्ट्रांत लक्ष्मी आणि सरस्वती या दोघी हातांत हात घालून क्रीडा करीत असतात. तूं स्वतन्त्र असल्याने पारतन्त्र्याच्या जाचाची कल्पना तुला होणार नाही. शशिकले ! माझ्या राष्ट्रांतील गुलामगिरीच्या चरकांत पिळून निघणाऱ्या असंख्य स्त्रीपुरुषांच्या हृदयद्रावक आक्रोशाने मी मूढ होऊन जातों. त्यांचें दारिद्य अवलोकन करून माझं हृदय दुभङ्ग होऊन जातं. अङ्गावरील जीर्ण वस्त्रांखेरीज दुसरें वस्त्र नसलेल्या हजारों भगनींची दु:स्थिति पाहून जीव दुक्खातिशयानें भांबावून जातो. अन्नावांचून अगणित लोक तडफडत आहेत-- असहाय्य कराच्या

ओझ्याखाली राजसत्ता रयतेला दडपून टाकीत आहे. उज्वल भवितव्याच्या आश्वासनाने जनतेची दिशाभूल चालविली आहे. त्याजबरोबर धर्मसत्तेने जुलूम चालविला आहे. सर्व बाजूंनी चन्द्रगिरीची चालविलेली गळचेपी आम्ही किती वेळ सहन करणार ? मानवाच्या सहनशक्तीला कांही विशिष्ट मर्यादा असतेच ना ? पारतन्त्र्याचे पाश तोडून टाकण्यासाठी चन्द्रगिरीने चालविलेल्या स्वातन्त्र्य युद्धांत हा कुमार प्राण गेला तरी माघार घेणार नाही. ( पडद्यांत दूरवर शिङ्ग वाजतें ) ऐक ! हें शिङ्ग ऐक. माझे लोक मला बोलावीत आहेत. स्वातन्त्र्य प्राप्त झाल्याशिवाय हा कुमार हातांतील शस्त्र खाली ठेवणार नाही. या युद्धांत माझा आणि माझ्या सर्व देशाचा होम झाला तरी चालेल.

**शशिकला**— कुमार ! आपलं एकेक वाक्य माझ्या हृदयांत कट्यारीसारखं शिरलं, आणि माझं हृदय छिन्न झालं. आपल्याकरिता आणि आपल्या हीन दीन देशबान्धवांकरिता मला कांहीच का करतां येणार नाही ?

**कुमार**— चालू युद्धांतील नाइलाजाने चाललेला भयङ्कर संहार थाम्बावा अशी इच्छा असल्यास तूं आपल्या वडिलांचें मत बदलूं शकणार नाहीस का ? आपल्या एकुलत्या एक लाडक्या कन्येचं वचन विक्रमसिंह खास मोडणार नाहीत ! पहा ! माझ्या असङ्ख्य दीनबान्धवांची हीन स्थिति पाहून जर तुला कळवळा येत असेल तर त्यांना गुलामगिरींतून वर काढण्याचें पुण्य पदरीं घे.

**शशिकला**— चन्द्रगिरीच्या स्वातन्त्र्याकरता मी माझ्याकडून परिश्रमांची पराकाष्ठा करीन.

**कुमार**— शशिकले ! या आश्वासनाबद्दल मी तुझा कसा उतराई होऊं ? तुझं सागरासारखं अगाध हृदय कमलाप्रमाणे कोमल असून नितराम् सम्वेदनक्षमहि आहे.

**शशिकला**— माझी सम्वेदनक्षम हृदयलता परिस्थितीच्या प्रखर तापाने सुकत चालली आहे. तिला प्रेमजलाचें सिञ्चन करून प्रफुल्लित नको का करायला ? ह्याखेरीज ती कार्यक्षम कशी होणार ?

**कुमार**— गतस्वातन्त्र्य प्राप्त करून घेतलं तरच माझ्या जीविताचं साफल्य झालं असं मला वाटेल. सूर्यास्त झाल्यावर पृथ्वीवर चन्द्राचें राज्य सुरू होतें, तद्वत् स्वातन्त्र्य प्राप्त होऊन ध्येयपूर्ती झाल्यावर या कुमाराला या मुखचन्द्राचेंच राज्य सुरू होईल.

( शशिकला लाजते. चन्द्रसेन मन्दाकिनीची जोडी प्रवेश करते ).

**चन्द्रसेन**— आपल्या एकान्तांत व्यत्यय आणला याबद्दल माफी असावी. कुमार ! बराच वेळ झाला. आपणाला शिबिरांत लवकर परतलं पाहिजे.

**कुमार**— ( हसून ) मग इतका वेळ तुम्ही काय करीत होता ?

**चन्द्रसेन**— सुखदुक्खाच्या गोष्टी बोलून आपलंच अनुकरण करीत होतों. ( सर्व हसतात )

**कुमार**— शशिकले ! जातों मी. चन्द्रकिरणाला लोभावलेला हा चकोर स्नेहल कटाक्षांची इच्छा करतो. हा चातक तुझ्या हृदयघनाच्या प्रेमबिन्दूची याचना करतों. या तृषाक्रान्त मयूरावर स्फूर्तिसुधेचा सहस्रधारांनी वर्षाव कर.

**शशिकला**— कुमार ! आपल्या पायदळींचें निर्माल्य होण्याचं भाग्य माझ्या वाट्यास आलं तरी मी स्वतःला धन्य समजेन. अङ्गीकृत कार्यांत आपणास यश येवो. यशाचें शिखर गाठतांना काय किंवा अपयशाच्या खोल व भयाण दरींत पडतांना काय माझा हात दूर लोटूं नये हीच प्राथना.

**( पडदा पडतो )**

## अङ्क चवथा

( शशिकलेचा महाल. महाल शृङ्गारणें सुरू असतें. सारङ्गनयना आसनें झाडून पुसून ठेवीत आहे. भिन्तीवरील सुन्दर चित्रें आणि चकचकीत हत्यारें पुसते. सारङ्गनयना काम करीत असतांना मन्दाकिनी लगबगीने प्रवेश करते. )

**मन्दाकिनी**— सारङ्गनयने ! ताईसाहेब कुठें आहेत ग ?

**सारङ्गनयना**— ताईसाहेब उद्यानांत गेल्या आहेत.

**मन्दाकिनी**— उद्यानांत आणि त्या गऽ कशाला ?

**सारङ्गनयना**— हाराला फुलें आणण्याकरिता !

**मन्दाकिनी**— हार ! आणि तो कुणाकरता ?

**सारङ्गनयना**— कुमारांच्याकरता !

**मन्दाकिनी**— चल चावट कुठली ! महाराज आणि कुमार यांचेमध्ये गेले दोन महिने युद्ध सुरू आहे. कुमार गऽ कसे येणार इथं ?

**सारङ्गनयना**— म्हणजे ! तुम्हाला कळलं नाही वाटतं ?

**मन्दाकिनी**— ( आश्चर्याने ) काय ?

**सारङ्गनयना**— युद्ध थांबलं असून तहाच्या अटी ठरविण्याकरता आज कुमार विशाळगडीं येणार आहेत ?

**मन्दाकिनी**— युद्ध थांबलं ? ते ग केव्हा ?

**सारङ्गनयना**— परवां ताईसाहेब शिकारीहून परत आल्या तेव्हापासून युद्ध बंद करण्याचा त्यांनी महाराजांजवळ हट्टच घेतला. महाराजांनी ताईसाहेबांना अनेक तऱ्हेने साङ्गून पाहिलं पण ताईसाहेबांचं आपलं एक म्हणणं-- ' युद्धांत भयंकर प्राणनाश होतो, तेव्हा युद्ध बन्द करा '— शेवटीं काल महाराजांनी माघार घेऊन युद्ध बन्द करण्याबद्दल कुमारांना लिहून पाठविलं.

**मन्दाकिनी—** एकेक ऐकावं तें नवलच ? महाराजांनी माघार घेतली ! मोठं आश्चर्य आहे हं ! बरं झालं बाई ! या युद्धानं किती तरी नुकसान झालं आमचं ? सर्वांचं जीवित धोक्यांत होतं. हजारों लोकांची प्राणहानी झाल्याने झालेलं नुकसान भरून निघणं अशक्य आहे. पैशाचा तर किती चुराडा झाला याचा पत्ताच नाही. पण कुमार तह करायला तयार आहेत का ?

**सारङ्गनयना—** हो तर ! ते तह करायला कबूल आहेत एवढेच नव्हे तर आज इथ तहाची वाटाघाट करण्यास स्वतः येणार आहेत.

**मन्दाकिनी —** मी दोन दिवस इथं नव्हतें तोपर्यंत किती तरी घडामोडी झाल्या ! पण काय ग ! ताईसाहेबांनी फुलें आणण्याचं कारण काय ?

**सारङ्गनयना—** तहाची वाटाघाट झाल्यावर कुमारांचा खाजगी स्वागतसमारम्भ याच महालांत होणार आहे. त्यांचं स्वागत नको का करायला ? म्हणून कुमारांच्या आवडीचीं फुलें आणण्याकरता ताईसाहेब स्वतः उद्यानांत गेल्या आहेत.

**मन्दाकिनी—** बरं, मी जाऊन आईसाहेबांना भेटून येते. ताईसाहेब आल्या कीं मला कळव हं ?

( मन्दाकिनी निघून जाते. सारङ्गनयना पुन्हा साफसफाईचें काम सुरू करते. थोड्याच वेळाने दुसऱ्या बाजूने शशिकला हातांत फुलांची परडी घेऊन प्रवेश करते. )

**शशिकला—** सारङ्गनयने ! मन्दाकिनी आली का ग ?

**सारङ्गनयना—** होय ताईसाहेब ! मन्दाकिनीताई आताच आल्या होत्या; त्या आईसाहेबांच्या दर्शनाला गेल्या आहेत.

**शशिकला—** मग राहूं दे तुझं काम. अगोदर मन्दाकिनीला हाक मारून आण पाहूं !

( सारङ्गनयना जाते. शशिकला परडींतील फुलें काढून झरझर हार गुम्फीत बसते. थोडा वेळ गुम्फून झाल्यावर मन्दाकिनी आणि सारङ्गनयना प्रवेश करतात. )

**मन्दाकिनी**— ताईसाहेब ! आपल्या नाजुक बोटांना श्रम देऊन कुणाकरता हार गुम्फीत आहांत ?

**शशिकला**— ( तिच्याकडे चोरट्या नजरेने पाहून ) देवाकरता !

**मन्दाकिनी**— ( लटकें आश्चर्य प्रदर्शित करुन ) अगबाई ! कोणता देव ?

**शशिकला**— माझा आवडता देव !

**मन्दाकिनी**— आवडता खरा पण त्याला नांव नाही कां ?

**शशिकला**— आपल्या देवाचं नांव घेऊं नये असं आपलं शास्त्र साङ्गतं !

**मन्दाकिनी**— ( मिस्किलपणाने ) अगबाई ! देवाचं नांव घ्यायची चोरी ! धन्य आहे. देवाचं हृदय चोरतांना शास्त्र आडवं येत नाही वाटतं ?

**शशिकला**— चल वात्रट कुठली. जीभ कशी चुरुचुरु करते नाही ? सारङ्गनयने ! ते दरबारांतून इकडे यायला निघाले की मला तावडतोब येऊन कळव म्हणजे त्यांना न कळत, महालांत ते प्रवेश करतांना मी त्यांच्यावर पुष्पांचा वर्षाव करणार आहें.

**मन्दाकिनी**— ताईसाहेब ! तें हो कोण ?

( सारङ्गनयना हसते )

**शशिकला**— तुला ग हसायला काय झालं ?

**मन्दाकिनी** — हसेल नाही तर काय करील बिचारी ? तुम्ही इतक्यांतच जर कुमारांच नांव घ्यायला लाजूं लागला तर मग प्रत्यक्ष कुमार महालांत आल्यावर कसं करणार ?

**शशिकला** – जा गं सारङ्गनयने ! तिचं काय ऐकतेस ?

तिच्या जिभेला नाही हाड. तिकडची कमी जास्त बातमी असल्यास प्रथम ती साङ्गण्यास इकडे ये. दरबारांत काय होतय ते सारं नीट पहा हं !

( सारङ्गनयना जाते )

**मन्दाकिनी** -- दोन महिन्यापूर्वीच्या बेफिकीर वृत्तीच्या ताईसाहेब आणि आताच्या प्रेमविद्ध ताईसाहेब यांत किती जमीन अस्मानूचं अन्तर पडलं आहे ! त्यावेळीं आपलं हृदय अविद्ध असल्याने सरोवराच्या प्रशान्त जलपृष्ठाप्रमाणे होतें. कुमारांची उपवनांत प्रथम गांठ पडली आणि त्या सरोवरांत प्रेमलहरी उत्पन्न झाल्या. जलपृष्ठावर अनेक वर्तुळाकार तरङ्ग उद्‌भूत झाले. कुमारांनी त्यांत एकामागून एक खडे टाकले. तरङ्गाच्या लाटा झाल्या. प्रणयाच्या तुफानांत ताईसाहेब सर्वस्व गमावून बसल्या.

**शशिकला** -- खरंच मन्दाकिनी ! कुमारांनी माझी हृदयकलिका प्रफुल्लित केली. प्रणयाच्या मन्द लहरींने मला आन्दोलनें दिलीं. माझ्या हृदयकलिकेंत त्यांनी सुगन्धी निश्वासांनी सुवास भरला.

**मन्दाकिनी** -- कुमारांच्या प्रथम दर्शनाने आपल्या मृगलोचनांत लज्जा चमकूं लागली, अभेद्य हृदय कम्पित वर्तिकेप्रमाणे कातर झालें व मुखचन्द्रावर अरुणपटल आलें. सर्व शरीरांत आनंदाच्या अज्ञेय लहरी उचम्बळूं लागल्या. आपल्या लज्जावनत नेत्रांतून सुटलेल्या कटाक्षशराने कुमारांचं हृदय विद्ध झालं.

**शशिकला**— त्यांचं हृदय विद्ध करण्याची शक्ति मजजवळ नव्हती. त्यांचं वीरहृदय मला जिङ्कतां आलं नाही त्यामुळ माझा अभिमान सर्व लयाला गेला. त्यांनीच माझं हृदय विद्ध केलं. त्यांच्या नेत्रांतील बाहुलीच्या हालचालीबरोबर माझ्या हृदयाची हालचाल सुरू झाली. त्यांच्या हृदयाशीं माझें हृदय सहसम्वेदन पावूं लागलें आणि शेवटीं त्यांचा मी ध्यासच घेऊन बसलें !

**मन्दाकिनी**— पण कुमारांनी आपल्याइतका आपला ध्यास नाही घेतला ?

**शशिकला**— प्रेम हें स्त्रीचें सर्वस्व असतें. प्रेम हाच स्त्रीचा जीवित हेतू असतो. प्रेमाशिवाय स्त्रीचें जीवन अशक्य होतें. स्वतःला विसरून दुसऱ्यावर प्रेम करणें यांतच तिला स्वर्गीय आनन्दाची प्राप्ति होते. आपल्या प्रत्येक कृतीने नव्हे प्रत्येक हालचालीने—प्रेमी जनांचें जीवन अधिक सुखमय करणें हेंच स्त्रियांचें कार्यक्षेत्र. पुरुषांची गोष्ट वेगळी. त्यांना जगांत वागायचं असतं. त्यांचें कार्यक्षेत्रच निराळें. जगांत स्वतःचें कर्तव्यकर्म यथासाङ्ग करून मग प्रेमाकडे त्यांना नजर द्यावी लागते. यांत कुमारांचा काय दोष ? देशाला स्वातन्त्र्य प्राप्त करून द्यायचं हें त्यांचं मुख्य ध्येय. तें साध्य करीत असतांहि मला देऊन उरेल इतकं प्रेम त्यांच्याजवळ आहे. मजविषयींच्या प्रेमांत प्रतारणा न करतां आपला इष्ट हेतू साध्य करण्याइतकं त्यांचं हृदय उदार अन् खम्बीर आहे. वृक्षाला घट्ट आलिङ्गन देऊन त्याच्या चरणावर पुष्पें वहावींत हें वेलीचं काम, तर वेलीला सांवरून सर्व जगाला फळें आणि छाया देणें हें वृक्षाचं काम. वेलीचा नाश झाला तर तिच्याकरता चार अश्रू टाकून आपलं कार्य वृक्षाला आमरण करावं लागतं. पण वृक्षाचा आधार गेला तर वेलीला प्राणत्यागाखेरीज गत्यन्तर नसतें.

**मन्दाकिनी**— दोन महिन्यांपूर्वी उगवलेली आशावेल प्रेमजलसिञ्चनाने आज बहराला आली, हें आमचं भाग्यच म्हटलं पाहिजे. पण ताईसाहेब ! आज आपण अङ्गाखान्द्यावर बहुमोल सुन्दर अलङ्कार नाही धारण केलेंत ? आणि हा अस्मानी रङ्गाचा शालू बरा परिधान केलांत ?

**शशिकला**— कुमारांना मी या रङ्गाच्या शालूंत अधीक सुन्दर दिसते, म्हणून हाच मी परिधान केला.

**मन्दाकिनी**— ताईसाहेब ! या अशा इथं बसा पाहूं. मी आपल्या अङ्गावर अलङ्कार घालते.

**शशिकला**— कुमारांना रत्नजडित अलङ्कार नाहीत आवडत. मी फुलांच्याच अलङ्काराने अधिक शोभेन असे ते म्हणतात. मी नाही रत्नांचे अलङ्कार धारण करणार !

**मन्दाकिनी**— ते कांही नाही ताईसाहेब ! उठा पाहूं आणि बसा इथं कशा ! मी साङ्गेन तसं ऐकायचं. गडबड नाही करायची !

**शशिकला**— इश्श ! हे ग काय मन्दाकिनी ? मला नकोत ते अलङ्कार. अलङ्काराने कांही सौन्दर्याची वाढ होत नाही. बाह्य कृत्रिम उपायांनी सौन्दर्य वाढतं असं का तुला वाटतं ?

**मन्दाकिनी**— तर तर ! हं उठायचं बरं ताईसाहेब ( शशिकलेला हाताला धरून उठविते) हं बसा अशा इथं ( तिला मध्ये चौरङ्गावर बसविते ) आता हट्ट नाही करायचा हं ! अगदीं मुकाट्यानं देवासारखं बसायचं बरं का ?

( शशिकलेला निरनिराळ्या रत्नांच्या व फुलांच्या अलङ्कारांनी मन्दाकिनी विभूषित करते. पडद्यामध्ये भैरवीचे कोमल सूर छेडलेले ऐकूं येतात. मन्दाकिनी शशिकलेस दोनतीनदां उभी करून अलङ्कार कसे काय साजून दिसतात हें मागून, पुढून, लाम्बून, जवळून निरखून पहाते. शशिकला अलङ्कारांनी विभूषित झाल्यावर एका कडेला उभी राहाते. )

**मन्दाकिनी**— ताईसाहेब ! या लावण्यलतिकेला पाहून उर्वशी, मेनका या स्वर्गीय अप्सरासुद्धा लाजेने खाली माना घालतील.

**शशिकला**— ( उसन्या रागाने मान वेळावून ) इश्श ! भारीच बाई चेष्टेखोर तू ! पण अजून कशी सारङ्गनयना आली नाही. माझा जीव कसा पाखरूं झाला आहे. उषेच्या आतुरतेने मी कुमारांची वाट पहात आहे. कृष्णपक्षांत निशासुन्दरीने रजनी-

नाथाची उत्कण्ठेनं वाट पहावी, पण प्रतिदिवशीं त्याने अधिकाधिक उशीर करावा आणि या विलम्बाने निशाहृदयांत अधिकच आतुरता उत्पन्न व्हावी. मन्दाकिनी ! त्या निशेच्या हृदयाप्रमाणेच माझंहि हृदय आज आतुरतेने विचलित झालं आहे.

**मन्दाकिनी**— आज कुमार येणार पण तहांत ठरणार तरी काय ?

**शशिकला**— कुमारांना— त्यांच्या चन्द्रगिरीला, बाबा पूर्ण स्वातन्त्र्य देणार. कुमारांनी विशाळगडाशीं सदैव मित्रत्वाच्या नात्याने वागावें आणि—

**मन्दाकिनी**— शशिकलाताईसाहेबांचा कुमारांनी स्वीकार करावा, असंच की नाही ?

**शशिकला**— ( वेडावून ) हो असंच बरं !

( सारङ्गनयना धांवत येते ).

**सारङ्गनयना**— ताईसाहेब, घात झाला ! घात झाला !

**शशिकला**— ( घाबरून ) काय झालं तरी काय ?

**सारङ्गनयना**— ( स्फुन्दत स्फुन्दत ) ताईसाहेब ! ही बातमी कोणत्या मुखानं मी आपणाला निवेदन करूं ?

**शशिकला**— ( घाबरून ) सारङ्गनयने ! काय असेल तें स्पष्ट साङ्ग. असं दुग्ध्यांत ठेवूं नकोस. मन चिन्ती तें वैरी न चिन्ती. एवढ्या वेळांत मनांत हजार वाईट कल्पना येऊन गेल्या.

**सारङ्गनयना**— ताईसाहेब ! वाड्यांत प्रवेश करीत असतांनाच कुमारांचा खून झाला.

**शशिकला**— काय म्हणतेस ? कुमारांचा खून ! तूं शुद्धीवर आहेस का ?

**सारङ्गनयना**— होय ताईसाहेब ! राजवाड्यांत पाऊल टाकल्या-बरोबर त्यांचा खून करण्यांत आला.

**शशिकला**—— ( दुक्खाने ) हाय रे नशीबा ! कुमार ! काय झालं हें ? कुमार ! आपण गेलांत मी तरी आता जगून काय करूं ?

**मन्दाकिनी**—— ( स्फुन्दत ) ताईसाहेब ! नका असा शोक करूं नका.

**शशिकला**—— कुमार ! कुमार ! थांबा. मला सोडून जाऊं नका. ही पहा तुमची लाडकी शशिकला आपल्या मागोमाग येत आहे.

( भ्रान्तचित्त होऊन शशिकला हळूहळू चालावयाला लागते, भिन्ती-वरचा सोनेरी खञ्जीर काढून हातांत घेते. तिच्या टपोऱ्या डोळ्यांत कसल्या तरी उग्र निश्चयाची दीप्ति झळाळते ).

**शशिकला**—— मन्दाकिनी ! हा सोनेरी खञ्जीर मला कुमारांनी दिला त्यावेळीं ते काय म्हणाले होते तुला आठवते आहे ?

( मन्दाकिनी कांहीच बोलत नाही. ती शान्त, निश्चल उभी राहते ).

**शशिकला**— कुमारांनी मला हा खञ्जीर दिला तेव्हा ते म्हणाले होते कीं—— ' जर तुझी माझी पुन्हा फिरून कधी भेट झाली नाही तर हा सोनेरी खञ्जीर माझी आठवण तुला सदैव करून देत जाईल. ' खरंच !

( खञ्जिराकडे निरखून पाहते ) कुमार, तुम्ही मला प्रेमाने दिलेला हा खञ्जीरच मला परत तुमच्याकडे घेऊन जाईल. प्रत्यक्ष तुमची भेट तर यापुढे नाहीच, मग तुमच्या या भेटवस्तूचें स्थान माझ्या हृदयावांचून दुसरें कोणतें ? कुमार—कु–मा–र.

( शशिकला छातींत खञ्जीर खुपसते आणि धाडकन् भूमीवर पडते. मन्दाकिनी तिला सावरण्याचा निष्फल प्रयत्न करते. सारङ्गनयना आणि मन्दाकिनी शशिकलेच्या निष्प्राण कलेवराकडे निश्चल पहात राहतात ).

**( पडदा पडतो )**

---

## —'शशाङ्क' यांचीं पुस्तकें—

### १ मालती

( प्रस्तावना लेखक— श्री. प्रल्हाद केशव अत्रे )

मालती हा एक भावपूर्ण, हृदयंगम व ओजस्वी काव्यसंग्रह आहे. या संग्रहांतील राष्ट्रीय कविता वाचून स्फूर्ति उत्पन्न होते. या संग्रहावर केसरी, नवाकाळ, ज्ञानप्रकाश, विहार, वसुन्धरा, पुरुषार्थ, सहविचार, महिला, ऐक्य इत्यादि नियतकालिकांचे व अनेक विद्वानांचे उत्कृष्ट अभिप्राय व परीक्षणें आहेत.

" शशाङ्क हे जोमदार व भावनाप्रधान कवि आहेत. कायदेभंगाचे चळवळींत त्यांनी सरकारी नोकरीवर लाथ मारली, हे त्यांच्या स्वदेश-भक्तीचें द्योतक आहे. शशाङ्क यांच्या या गुणाला साजेल अशीच त्यांची कविता आहे. कवितेची भाषा प्रसंगानुसार जोरदार अगर मृदु आहे."—

केसरी

" शशाङ्क या टोपण नांवाखालीं निष्कलंक काव्य लिहिणारे श्री० दाभाडे यांच्या कवितांचा हा संग्रह वाचनीय आहे. ह्या कवितांत प्रसाद व माधुर्य आहे. शिवाय कल्पना व अन्तःकरणाची तळमळ आहे"—

ना० गो० चापेकर

छपाई सुन्दर, बान्धणी मोहक. किंमत १० आणे.

### २ भारतीय चित्रकला

भारतीय चित्रकलेचा संगतवार इतिहास याच पुस्तकांत पहिल्याप्रथम प्रसिद्ध होत आहे. या विषयावर मराठी भाषेंत हाच पहिला मोठा ग्रन्थ आहे. कला आणि नीति, पाश्चिमात्य आणि पौर्वात्य चित्रकला यांतील भेद, अजिण्ठादि चित्रकलापद्धति इत्यादि विषयांचें मार्मिक विवेचन या प्रबन्धांत आढळून येईल. आंत तिरंगी सहा चित्रें असून छपाई सुन्दर व बांधणी मोहक आहे. किंमत २ रुपये

### ३ शशिकला

भावपूर्ण नाटिका. किंमत ६ आणे

## 'शशाङ्क' यांचीं पुढील प्रकाशनें

### ४ मरीचिका

भिन्नभिन्नप्रसंगीं लेखकाच्या अन्तःकरणांत ज्या भावलहरी उद्भूत झाल्या, त्याच यांत काव्यपूर्ण भाषेंत चित्रित केल्या आहेत. जीवनमार्ग आक्रमीत असतांना मरीचिका दर्शनानें आयुष्यांत आलेले आनन्दाचे व दुक्खाचे अनुभव यांत ग्रथित केले आहेत. छापत आहे. किंमत ८ आणे.

### ५ शशिप्रभा

नृत्यकला, संगीतकला, व्यास आणि मुक्तेश्वर यांचीं नलोपाख्यानें इत्यादि सुन्दर निबन्धांचा यांत संग्रह केला आहे. शिवाय यांत पांच पुस्तकांची रसोद्ग्राही समीक्षणेंही आहेत.

### ६ काव्यलेखा

राष्ट्रीय, प्रेमपर, सृष्टिवर्णनात्मक कवितांचा हा रमणीय दुसरा संग्रह. यांतील सर्वच कविता नवीन व अप्रकाशित असून 'मालती' हून हा संग्रह सरस आहे.

---

## साहित्य-सरोज-मण्डळाचीं पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | सरोज ( पद्य, मण्डळ ) | ०—४—० |
| २ | शेती—शेतकरी ( पोवाडा—मा. कृ. दाभाडे ) | ०—४—० |
| ३ | मालती ( पद्य—शशाङ्क ) | ०—१०—० |
| ४ | भारतीय चित्रकला ( प्रबन्ध, शशाङ्क ) | २—०—० |
| ५ | शशिकला ( नाटिका, शशाङ्क ) | ०—६—० |
| ६ | आकाशगङ्गा ( पद्य, श्री. ग. दाढे ) छापत आहे | ०—१२—० |
| ७ | मरीचिका ( गद्य—शशाङ्क ) छापत आहे. | ०—८—० |

पुस्तकें मिळण्याचें ठिकाण—बालकृष्ण मार्तण्ड दाभाडे,

मु. पो. औन्ध ( जिल्हा सातारा )